# श्रीमद्भगवद्गीता 7 वा अध्याय

श्रीमद्भगवद्गीतेच्या 7 व्या अध्यायाचे नाव आहे 'ज्ञान विज्ञान योग'. यामध्ये एकूण 30 श्लोक आहेत.

**श्री भगवानुवाच**

**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः। असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु।।7.1।।**

श्रीभगवानुवाच - हे पार्थ! मयि आसक्त-मनाः मत् आश्रयः योगम् युञ्जन्, यथा समग्रम् माम् असंशयम् ज्ञास्यसि, तत् शृणु।

श्रीभगवानुवाच -

हे पार्थ!

मयि माझ्यात अस्मद् स. ए. व.

आसक्त-मनाः मनाने आसक्त होऊन

आसक्त मनस् पु. प्र. ए. व.

मत् आश्रयः मला शरण येऊन अस्मद् आश्रय पु. प्र. ए. व.

श्रि धातु सेवा करणे

योगम् योगाने योग पु. द्वि. ए. व.

युञ्जन् जोडून घेऊन युञ्जत् पु. प्र. ए. व.

युज् धातु जोडणे शतृ प्रत्यय

यथा जसे अव्यय

समग्रम् पूर्णपणे समग्र पु. द्वि. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

असंशयम् निःसंशय असंशय पु. द्वि. ए. व.

ज्ञास्यसि समजेल ज्ञा धातु कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

तत् ते तद् नपु. द्वि. ए. व.

शृणु ऐक श्रुत. धातु कर्तरि लोट् लकार म. पु. ए. व.

6व्या अध्यायातील शेवटच्या श्लोकात सर्वश्रेष्ठ योगीची व्याख्या सांगितली होती. ज्याच्या कणाकणात परमेश्वराचे अस्तित्व भरून गेले आहे तोच सर्व श्रेष्ठ योगी असे म्हटले आहे. आता भगवंत स्वतः च स्वतःची ओळख करून देणार आहेत. परमेश्वराची व्याप्ती आपल्याला माहीत आहे त्याच्या सृजनशीलतेची आपल्याला ओळख झाली आहे.याचाच अर्थ 'इदम् न मम्' हे त्याला पूर्णपणे पटले आहे. एखाद्याला तो सतत जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी जाणवत आहे म्हणजेच आता भक्तीयोगाची सुरवात झाली आहे. आतापर्यंत आपण ज्ञान आणि कर्मयोग ह्या बद्दल वाचले आता येथून पुढे आपण भक्तीयोग बद्दल वाचणार आहोत. ह्या श्लोकातील दोन शब्द महत्त्वाचे मय्यासक्त मन आणि मत् आश्रय. आता योगीला फक्त परमेश्वराचीच आसक्ती उरली आहे. अज्ञानी व्यक्ती जगण्यासाठी पंचमहाभूतांवर अवलंबून असते मात्र ज्ञानी पुरुष फक्त परमेश्वराचा आश्रय घेतो.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे सांगत आहेत की

हे पार्थ! तुझे मन माझ्यात आसक्त होऊन आणि तू माझा आश्रित होऊन, योगाचा अभ्यास करत असता मला समग्ररूपाने, निःसंशय जाणू शकशील ते तू ऐक.

---

**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः। यज्ज्ञात्व नेह भूयोऽन्यज्ज्ञतव्यमवशिष्यते।।7.2।।**

अहम् ते इदम् सविज्ञानम् ज्ञानम् अशेषतः वक्ष्यामि यत् ज्ञात्वा इह भूयः अन्यत् ज्ञातव्यम् न अवशिष्यते।

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

ते तुझ्या साठी युष्मद् च. ए. व.

इदम् हे इदम् नपु. द्वि. ए. व.

सविज्ञानम् विज्ञानासहीत सविज्ञान नपु. द्वि ए. व.

ज्ञानम् ज्ञान नपु. द्वि. ए. व.

अशेषतः संपूर्णतः तासिल प्रत्यय

वक्ष्यामि सांगेन वच् धातू लृट लकार उ. पु. ए. व.

यत् जे यद् नपु. द्वि. ए. व.

ज्ञात्वा जाणून ज्ञा धातू क्त्वा प्रत्यय

इह इहलोक अव्यय

भूयः परत अव्यय

अन्यत् इतर अन्य नपु. द्वि. ए. व.

ज्ञातव्यम् जाणण्यायोग्य ज्ञा धातू तव्यत प्रत्यय नपु. द्वि. ए. व.

न अव्यय

अवशिष्यते शिल्लक राहते अव+शिष् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

6व्या अध्यायातील 39 व्या श्लोकात अर्जुनाने श्रीभगवानकृष्णांप्रती आपला आदर आणि विश्वास निःसंकोचपण व्यक्त केला होता. तुम्हीच मला योग्य दिशा दाखवू शकता असे म्हटले होते. त्या विश्वासाचे प्रतिबिंब ह्या श्लोकात उमटले आहे.

हा श्लोक वाचला की मुण्डक उपनिषद् मधील 1.1.3 ह्या मंत्राची आठवण होते कस्मिन्नु भगवो विज्ञाते सर्वं इदं विज्ञातां भवति।

शौनक ऋषी अंगिरा ऋषींना विचारत आहेत की जे जाणल्यावर सर्व काही ज्ञात होते असे ते कोणते ज्ञान आहे?

श्रीमद्भगवद्गीतेच्या 4थ्या अध्यायातील 3 र्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला तू माझा मित्र आणि परम भक्त असल्याने, मी तुला रहस्य सांगत आहे असे म्हटले आहे.

जे ज्ञान आपल्याला उपजत असते ती अंतःप्रेरणा.

जे आपल्याला शिक्षणाने मिळते ते ज्ञान. जे अनुभवातून मिळते ते आत्मज्ञान. जसे साखरेचा गोडवा चव घेतल्यानंतरच समजतो. विज्ञान म्हणजे विशेष ज्ञान. सध्याच्या काळातील प्रयोगशाळेतील ज्ञान नव्हे तर आत्मज्ञान. असे म्हणतात की वेद व्यासांनी श्रीमद्भागवत लिहीण्याआधी भक्तीमार्ग अवलंबला आणि मग लिहायला सुरुवात केली. ते आपल्या ज्ञानावर विसंबून राहिले नाहीत.

भक्तियोगेन मनसि सम्यक् प्रणिहितेऽमले । अपश्यत्पुरुषं पूर्णं मायां च तदपाश्रयम् ॥ ४ ॥

भक्तीयोग द्वारा (महर्षी व्यासांनी) मन एकाग्र आणि शुद्ध करून परमेश्वराच्या बाह्य माया शक्ती सहित पूर्ण दर्शनाची अनुभूती घेतली.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे सांगत आहेत की

मी तुला विज्ञानासहीत ते समग्र ज्ञान सांगेन जे जाणून घेतल्यानंतर ह्या जगात तुला जाणून घेण्याजोगे काहीही उरणार नाही.

---

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये। यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः।।7.3।।**

मनुष्याणाम् सहस्रेषु कश्चित् सिद्धये यतति; यतताम् सिद्धानाम् अपि कश्चित् माम् तत्त्वतः वेत्ति।

मनुष्याणाम् मनुष्यांमधे मनुष्य पु. ष. ब. व.

सहस्रेषु हजारोंपैकी सहस्त्र पु. स. ब. व.

कश्चित् कोणी एक कः+चित् पु. प्र. ए. व.

सिद्धये सिद्धि प्राप्ती साठी सिद्धि स्त्री. च. ए. व.

यतति प्रयत्न करतात यत् धातु कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

यतताम् प्रयत्न करणारे  यत् धातु कर्तरि आत्मनेपदी लोट लकार प्र. पु. ए. व.

सिद्धानाम् योगींमधे सिद्ध पु. ष. ब. व.

अपि सुद्धा अव्यय

कश्चित् कोणी एक कः+चित् पु. प्र. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

तत्त्वतः अव्यय

वेत्ति जाणतात विद् धातु कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

ह्या श्लोकात असलेल्या सिद्धि ह्या शब्दाचा अर्थ समजावून घ्यायला हवा. सिद्धि म्हणजे अलौकिक शक्ती, सामर्थ्य, सफलता, निष्पादन, पूर्ति, लक्ष्य प्राप्ती, परिपक्वता, मोक्ष वगैरे. विशिष्ट योगसाधना केल्यावर योग्याला स्वतःच्या चित्तात, इंद्रियांत किंवा शरीरात असणाऱ्या असाधारण योग्यतेची होणारी जाणीव. 'सिध्' धातु क्त प्रत्यय असा तयार झालेला हा शब्द. पंचतंत्रामध्ये सिद्धि म्हणजे असामान्य कौशल्य, असामान्य क्षमता.

'जन्म औषधि मन्त्र तपः समाधिजाः सिद्धयः 'पतंजली योगसूत्र 4.1। जन्माने, औषधिद्वारा, मन्त्राद्वारा, तपाने आणि समाधीने सिद्धींची प्राप्ती होते.

अणिमा महिमा चैव लघिमा गरिमा तथा।

प्राप्तिः प्राकाम्यमीशित्वं वशित्वं चाष्ट सिद्धयः॥

अणिमा , महिमा, लघिमा, गरिमा, प्राप्ति, प्राकाम्य, इशित्व आणि वशित्व अशा "अष्टसिद्धि" आहेत.

त्यापैकी व्याप्ती आणि प्राकाम्य ह्या ज्ञान-सिद्धी

वशिता, ऐश्वर्य आणि इशिता ह्या शक्ती-सिद्धी

महिमा, लघिमा आणि अणिमा ह्या शरीर-सिद्धी आहेत.

श्रीभगवानकृष्णांची विविध रूपे आपल्याला माहीत आहेत. त्यांच्या निरनिराळ्या स्वरूपात आपल्याला त्यांच्या व्यक्तीमत्वाची विविध रूपे उमगतात. पूर्णतः श्रीभगवानकृष्णांना समजून घेणे तसे कठीणच. 'मुह्यन्ति यत् सूर्यः' कृष्णाच्या बाबतीत भलेभले भ्रमित होतात असे सार्थ वर्णन श्रीमद्भागवताच्या पहिल्या श्लोकात केले आहे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

हजारो माणसांमध्ये क्वचित एखादाच आपला पुरूषार्थ साध्य व्हावा असा प्रयत्न करतो. असा प्रयत्न करणाऱ्या एखाद्यालाच माझे तात्विक ज्ञान (यथार्थ रूप) समजते.

---

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च। अहंकार इतियं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा।।7.4।।**

भूमिः, आपः, अनलः, वायुः, खम्, मनः, बुद्धिः च अहङःकारः इति इयम् मे अष्टधा भिन्ना प्रकृतिः एव

भूमिः पृथ्वी भूमि स्त्री. प्र. ए. व.

आपः जल आप स्त्री . प्र. ए. व.

अनलः अग्नी अनल पु. प्र. ए. व.

वायुः वायु पु. प्र. ए. व.

खम् आकाश ख नपु. प्र. ए. व.

मनः मनस् नपु. प्र. ए. व.

बुद्धिः बुद्धि स्त्री. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अहङःकारः अहङःकार पु. प्र. ए. व.

इति असे अव्यय

इयम हे इदम् स्त्री. प्र. ए. व.

मे माझे अस्मद् ष. ए. व.

अष्टधा आठ प्रकार अव्यय

भिन्ना निरनिराळे भिन्ना स्त्री. प्र. ए. व.

प्रकृतिः प्रकृति स्त्री. प्र. ए. व.

एव सुद्धा अव्यय

आधीच्या श्लोकात खडतर प्रयत्नशील माणसाला माझ्या यथार्थ रूपाचे दर्शन घडते असे म्हटले होते आता ह्या श्लोकात परमेश्वराच्या अष्टपैलू रूपांची नावे सांगितली आहेत.

आपण अगदी जरी स्थिर बसलेलो असलो तरी आपल्याला पृथ्वी स्वतः बरोबर सूर्याच्या भोवती फिरवत असते म्हणजेच कोणतीही गोष्ट इथे स्थिर नाही.

वस्तूमान आणि ऊर्जा ह्याचे सूत्र आईनस्टाईन ने सांगितले, आधुनिक शास्त्राप्रमाणे आपल्या प्रकृतिचे 118 घटक आहेत. त्यानंतर आली क्वांटम थियरी. ज्यामधे आईनस्टाईन चा विचार सूक्ष्म कणांच्या साह्याने मांडला गेला.

तस्माद वा एतस्माद आत्मनः आकाशः संभूतः |आकाशात वायु:| वायो:अग्निः | अग्ने: आपः | अद्भ्यः पृथिवी | तैत्तिरीय उपनिषद् 2.1.2

आत्मतत्त्व' पासून आकाश आकाशापासून  वायु; वायु पासून अग्नि; अग्नि पासून जल  उत्पन्न झाले. आणि जळापासून पृथ्वी निर्माण झाली.

प्रकृतीला मूलप्रकृती, अहेतुमत्, प्रधान, अव्यक्त अशीही नावे आहेत.

प्रकृति च्या उत्पत्तीचे दुसरे कारण, हेतु नसल्यामुळे तिला अहेतुमत् म्हटले आहे.

इंद्रियांना न दिसणारी असल्यामुळे तिला अव्यक्त म्हटले आहे.

प्रकर्षेण करोति इति प्रकृति:' अर्थात् जे (सृष्टीतील पुरुषाव्यतिरिक्त सर्व अन्य तत्त्वांना) उत्पन्न करते, ते तत्त्व म्हणजे प्रकृती होय. सांख्यदर्शनानुसार सत्त्व, रज आणि तम हे त्रिगुण जेव्हा साम्यावस्थेत असतात, त्या अवस्थेलाच प्रकृती हे नाव आहे (सत्त्वरजस्तमसां साम्यावस्था प्रकृति:| सांख्यसूत्र १.६१)

पृथ्वी, जल, अग्नी, वायू आणि आकाश ही पाच स्थूल महाभूते ज्या सूक्ष्म तत्त्वांपासून उत्पन्न होतात, त्यांना तन्मात्र असे म्हणतात. गंधतन्मात्र, रसतन्मात्र, रूपतन्मात्र, स्पर्शतन्मात्र आणि शब्दतन्मात्र अशी पाच तन्मात्रांची नावे आहेत. सांख्य-योग दर्शनांमध्ये मानलेल्या सत्कार्यवादाच्या सिद्धांतानुसार महाभूते ही उत्पत्तीच्या आधीही त्यांच्या कारणांमध्ये म्हणजेच तन्मात्रांमध्ये सूक्ष्म

रूपाने अस्तित्वात असतात व नंतर ती प्रकट होतात. तन्मात्र हे महाभूतांचे पूर्वरूप आहे. तन्मात्र सूक्ष्म असल्यामुळे त्यांचे ज्ञान इंद्रियांद्वारे होऊ शकत नाही.

अहंकार म्हणजे इगो असे जे आपण समजतो त्यापेक्षा त्याचा अर्थ इथे थोडा वेगळा आहे.

आपल्या भारत देशाचा  तिरंगा आपण अभिमानाने मिरवतो, आपले राष्ट्रगीत आहे, म्हणजे भारतीय म्हणुन ती आपली ओळख आहे. ह्याला अहंकार असे म्हणतात.

इन्द्रियांपेक्षा मन श्रेष्ठ, मनापेक्षा श्रेष्ठ बुद्धि आणि बुद्धि पेक्षा श्रेष्ठ आत्मा आहे हे आपण 6.42 मध्ये वाचले आहे. मन हे वायू तत्त्वापासून, बुद्धी हे तेज, चित्त आकाश, तर अहंकार हा पृथ्वी तत्त्वापासून बनले आहे.

सांख्यकारीकेत बुद्धीचे असे वर्णन केले आहे.

अध्यवासयो बुद्धिर्धर्मो ज्ञानं विराग ऐश्वर्यम् |

सात्विकमेतद् रूपं तमसमास्मद् विपर्यस्तम् ||

बुद्धि चे आठ प्रकार आहेत.ज्याचे दोन भाग आहेत. सात्विक आणि तामसिक. सात्विक बुद्धि म्हणजे धर्म (पुण्य), ज्ञान (ज्ञान), वैराग्य (वैराग्य) आणि ऐश्वर्य (शक्ति). त्याच्या विरुद्ध तामसी म्हणजे अधर्म, अज्ञान, आसक्ती आणि अनैश्वर्य.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

पृथ्वी, जल, अग्नी, वायू, आकाश, मन, बुद्धी आणि अहंकार अशा 8 प्रकारांनी माझे स्वरूप भिन्न झाले आहे.

---

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्। जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत्।।7.5।।**

इयं हे महाबाहो! तु अपरा इतः अन्याम् जीव-भूतम् मे परम् प्रकृतिम् विद्धि, यया इदम् जगत् धार्यते।

इयम् हिइदम् स्त्री. प्र. ए. व.

अपरा कनिष्ठ अपरा स्त्री. प्र. ए. व.

हे महाबाहो!

तु परन्तु अव्यय

इतः ह्याची अव्यय

अन्यां इतर अन्या स्त्री. द्वि. ए. व.

जीव-भूतम् सजीव रूप जीव-भूता स्त्री. द्वि. ए. व.

मे माझी अस्मद् ष. ए. व.

पराम् श्रेष्ठ परा स्त्री. द्वि. ए. व.

प्रकृतिम् प्रकृति प्रकृति स्त्री. द्वि. ए. व.

विद्धि जाण विद् धातु कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

यया जिने यद् स्त्री. तृ. ए. व.

इदम् हे इदम् नपु. द्वि. ए. व.

जगत् जग जगत् पु. द्वि. ए. व.

धार्यते धारण केले आहे धृ धातु णिच प्रत्यय कर्मणि लट् लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

परा आणि अपरा प्रकृति अशा शब्दांचा उल्लेख ह्या श्लोकात आहे. त्याचे अर्थ नीट समजून घ्यायला हवे. मुण्डकोपनिषदातील प्रथम मुण्डकातील प्रथम खण्डात अपरा आणि परा विद्या यांचा उल्लेख करून त्यातील फरक समजावून सांगितला आहे. आधीच्या श्लोकात आपण प्रकृती ची आठ तत्वे जाणून घेतली. पण हि सर्व गौण तत्वे आहेत असे ह्या श्लोकात म्हटले आहे. आणि ह्या सर्वापेक्षा श्रेष्ठ ती परा प्रकृती. पण श्रेष्ठ च्या विरूद्ध कनिष्ठ म्हणजे नक्की काय? तर जी प्रकृती अशुद्ध, विकार निर्माण करणारी, संसाराच्या बंधनात टाकून जीवन-मृत्यु च्या चक्रात अडकवणार, अहंकार निर्माण करून संकटात लोटणारी अशी अपरा प्रकृती. त्याविरुद्ध शुद्ध, विकारशून्य, अद्भुत, आनंददायी, चैतन्यमय अशी परा प्रकृती. हाच प्रकृति आणि पुरुष ह्यामधील फरक आपल्याला समजून घ्यायचा आहे. कारण प्रकृती च्या प्रत्येक सूक्ष्म कणात अणूरेणूंची

हालचाल सुरू आहे. अगदी वनस्पती सुद्धा सजीव आहेत हे आता सिद्ध झाले आहे. ह्या व्यतिरिक्त आणखी एका उर्जेचा उल्लेख येथे केला आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

हे महा-बाहो! (वर सांगितलेली) हि अपरा प्रकृति आहे. ह्यापेक्षा निराळी अशी माझी श्रेष्ठ प्रकृती आहे, जी चैतन्ययुक्त सर्व विश्वाला धारण करणारी अशी आहे हे तू जाण.

---

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय। अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा।।7.6।।**

सर्वाणि भूतानि एतत् योनीनि । अहम् कृत्स्नस्य जगतः प्रभवः तथा प्रलयः इति उपधारय ।

सर्वाणि सर्व सर्व नपु. प्र. ब. व.

भूतानि सजीव भूत नपु. प्र. ब. व.

एतत् ह्या एतद् नपु. प्र. ए. व.

योनीनि गर्भधारणेचा अवयव योनीन् नपु. प्र. ब. व.

यु धातू एकत्र येणे

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

कृत्स्नस्य संपूर्ण कृत्स्न नपु. ष. ए. व.

जगतः जगावर जगत् नपु. ष. ए. व.

प्रभवः निर्माण होणे प्रभव पु. प्र. ए. व.

तथा त्याप्रमाणे अव्यय

प्रलयः लयास जाणे प्रलय पु. प्र. ए. व.

प्र+लयः

इति अव्यय

उपधारय (तू) समज उप+धृ धातु धारण करणे णिच् प्रत्यय कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

मागील दोन श्लोकात पुरुष आणि प्रकृती, जीव सृष्टी निर्माण होण्यासाठी आवश्यक असलेली 25 तत्व ह्या सर्व गोष्टींची चर्चा केली.

योनि ह्या शब्दाचा अर्थ आपल्याला जो समजतो तोच म्हणजे गर्भधारणा होण्याचा अवयव. पण गीतेचा अर्थ जाणून घेताना ह्यापेक्षा जास्त अपेक्षा ठेवायला हरकत नाही.

आपल्याला 84 लाख योनि, म्हणजे इतक्या प्रकारचे जन्म हे माहीत आहे

पदम् पुराणातील श्लोकानुसार...

जलज नव लक्षाणी, स्थावर लक्ष विम्शति, कृमयो रूद्र संख्यक:। पक्षिणाम दश लक्षणं, त्रिन्शल लक्षानी पशव:, चतुर लक्षाणी मानव:।। -(78:5 पद्मपुराण)

1.पाण्यात राहणारे जीव-जंतु- 9 लाख  2. वनस्पति - 20 लाख

3.कीड़े-मकौड़े- 11 लाख

4.पक्षी- 10 लाख

5.पशु- 30 लाख

6.देवता-दैत्य-दानव-मनुष्य - 4 लाख

एकूण 84 लाख

प्रत्येक प्राण्याचे स्वतः चे वैशिष्ट्य आहे म्हणजे त्याचा आकार वजन रंग काम करण्याची क्षमता इ. आता हे सर्व कशामुळे ठरते? आधुनिक जगात ह्यालाच जेनेटिक्स म्हणतात.

आपटेंच्या डिक्शनरी प्रमाणे योनि म्हणजे आरंभ कींवा स्रोत. 84 लाख जीवांचा स्रोत म्हणजे योनि. गर्भधारणेची प्रक्रिया काही एकदाच घडत नाही. पुन्हा पुन्हा निर्मिती करणारी ती योनि

इथे मनुस्मृति तल्या श्लोकाचा उल्लेख करावासा वाटतो

एषा धर्मस्य वो योनिः समासेन प्रकीर्तिता ।

सम्भवश्चास्य सर्वस्य वर्णधर्मान्निबोधत ॥ 2.25 ॥

आपल्याला सर्वांच्या उत्पत्ति आणि धर्माबद्दल वर्णन करून सांगितले आता वर्णाबद्दल जाणून घ्या.

चातुर्वर्ण्याचा उल्लेख आपण 4 थ्या अध्यायात वाचला आहेच. जेनेटिक्स ची कल्पना ह्या सर्व श्लोकातून अगदीच स्पष्ट होते.

मम योनिर्महद् ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् |

सम्भव: सर्वभूतानां ततो भवति भारत ।14.3।।

हे भारत! ब्रह्म नामक  भौतिक तत्व हे सर्वांच्या जन्माचे मूळ आहे. ह्याला मी गर्भस्थ करतो आणि सर्व जीव निर्माण होतात.

प्रकृती च्या उत्पत्ती बददल बोलत आहोत म्हणून ऋग्वेदातील हा श्लोक पाहू

नासदासीन्नोसदासीत्तादानीं नासीद्रजो नो व्योमापरो यत |किमावरीव: कुहकस्यशर्मन्नम्भ: किमासीद्गहनं गभीरं ||

सृष्टी से पहले सत् नहीं था, असत् भी नहीं अन्तरिक्ष भी नहीं, आकाश भी नहीं था

छिपा था क्या? कहाँ? किसने ढका था?

उस पल तो, अगम अतल जल भी कहाँ था?

हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेकासीत ।

स दाधार पृथ्वीं ध्यामुतेमां कस्मै देवायहविषा विधेम ॥ ऋग्वेद 10 - 121-1

हिरण्यगर्भः चा शाब्दिक अर्थ सोन्याचे अंडे

आपल्या सृष्टिला जन्माला घालणारे. सूर्याला उद्देशून असे म्हटले आहे.

ह्या अंड्यापासून आकाश आणि पृथ्वी निर्माण झाली. ईश्वरी शक्तिमूळे आकाश पाणी अवकाश सर्वांची निर्मीती झाली.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

भौतिक आणि जीवशक्ती मूळे ही सृष्टी निर्माण झाली, त्या निर्मिती प्रक्रियेची सुरवात माझ्या पासून झाली आणि त्याची विल्हेवाट सुद्‌धा मीच लावतो.

---

**मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति धनञ्जय। मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव।।7.7।।**

हे धनञ्जय! मत्तः परतरं अन्यत् किञ्चित् न अस्ति। इदम् सर्वम् सूत्रे मणिगणाः इव मयि प्रोतम्।

हे धनञ्जय!

मत्तः माझ्या पेक्षा तासिल प्रत्यय

परतरं श्रेष्ठ परतर नपु. प्र. ए. व.

अन्यत् अन्य नपु. प्र. ए. व.

किञ्चित् कोणीही नपु. प्र. ए. व.

न अव्यय

अस्ति आहे अस् धातु कर्तरि लट् लकार प्र. पु. ए. व.

इदम् हे इदम् नपु. प्र. ए. व.

सर्वम् सर्व नपु. प्र. ए. व.

सूत्रे धाग्यात सूत्र नपु. स. ए. व.

मणिगणाः मणी मणिगण पु. प्र. ब. व.

इव सदृश अव्यय

मयि माझ्यात अस्मद् स. ए. व.

प्रोतम् बांधले गेले आहे प्र+उ धातु क्त प्रत्यय उत वर जाणे (ओतप्रोत, तुडुंब भरून जाणे) नपु. प्र. ए. व.

हा श्लोक वाचला की समुद्राच्या लाटांची आठवण येते. समुद्रातून लाटा उसळतात, लाटा म्हणजेच समुद्र आणि पुन्हा लाटांचे पाणी समुद्राला मिळते.

ह्या श्लोकात मणिगण असा शब्द वापरला आहे.

आधीच्या 3,4 श्लोकांचा अर्थ नीट समजावून घेतल्यानंतर ह्या श्लोकात त्याचा निष्कर्ष सांगितला आहे.

ह्या सृष्टिला निर्माण करणारा मीच, ह्या सृष्टिचे संगोपन करणारा मीच आणि त्याचा नायनाट करणाराही मीच. (नायनाट हा शब्द वापरताना पृथ्वीवर घडणारे उत्पात, हिमयुग, भूकंप, वादळे त्सुनामी वगैरे)

न तस्य कार्यं करणं च विद्यते न तत्समश्चाभ्यधिकश्च दृश्यते। श्वेताश्वतरोपनिषद्-6.8

'त्याचे' कर्म असे काहीही नाही, त्याचा काही कार्य कारण (साधनभूत अंग) भाव सुद्धा नाही. 'त्याच्या ' सारखा किंवा त्याच्या पेक्षा मोठे कोणीही नाही.

इन्द्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः ।

मनसस्तु परा बुद्धिर्बुध्देरात्मा महान् परः ।। महतः परमव्यक्तमव्यक्तात् पुरुषः परः । पुरषान्न परं किंचित्न्सा काष्ठा सा परा गतिः ।।

कठोपनिषद् अध्याय 1 वल्ली 3, श्लोक 10-11।।

इन्द्रियांपेक्षा इन्द्रियांचे विषय मोठे आहेत, इन्द्रिय विषयांपेक्षा मोठे मन, मनापेक्षा मोठी ज्ञान-शक्ति, आणि त्याहीपेक्षा महान महापुरुष आहे.

त्या महान् आत्मा पेक्षा मोठा 'अव्यक्त' आहे, 'अव्यक्त' च्या वर 'पुरुष'; आणि 'पुरुषापेक्षा महान काहिही नाही. हिच शक्ती पराकाष्ठा परम लक्ष्य (परा गति) आहे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

श्रीभगवान असे म्हणतात की माझ्याशिवाय इतर काहीही श्रेष्ठ नाही. सगळ्याची सुरवात माझ्यापाशी होते आणि शेवट सुद्धा. जसे एखाद्या हारा मधे मणी गुंफलेले असतात, त्या मण्यांचे विशिष्ट स्थान ठरलेले असते तसेच सर्व गोष्टी माझ्यापाशी गुंफलेल्या असतात.

---

**रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः। प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु।।7.8।।**

हे कौन्तेय! अहम् अप्सु रसः, शशि-सूर्ययोः प्रभा, सर्व-वेदेषु प्रणवः, खे शब्दः, नृषु पौरुषम् अस्मि।

हे कौन्तेय!

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

अप्सु जळातील अप स्त्री. स. ब. व.

रसः रस रस पु. प्र. ए. व.

शशि-सूर्ययोः चंद्र सूर्यातील शशिन्-सूर्य पु. स. द्वि. व.

प्रभा तेज प्रभा स्त्री. प्र. ए. व.

सर्व-वेदेषु सर्व वेदांतील सर्व-वेद पु. स. ब. व.

प्रणवः प्रणव पु. प्र. ए. व.

खे आकाशातील ख नपु. स. ए. व.

शब्दः शब्द पु. प्र. ए. व.

नृषु नरातील नृ पु. स. ब. व.

पौरुषम् पौरुषत्व पौरुष नपु. द्वि. व.

अस्मि आहे अस् धातु असणे कर्तरि लट् लकार उ. पु. ए. व.

हिमालयातून प्रभवणारी गंगा, सर्वांनाच जीवंत ठेवते. पर्वतातून वाहणाऱ्या पाण्याचे नैसर्गिकरीत्या शुद्ध होते. आपण आपल्या सोयीसाठी क्लोरिन चे पाणी पितो पण खरे पाणी तेच ज्यात

जीवजंतू राहू शकतात.  काळाच्या ओघात जलचिकीत्सा मागे पडली. नाहीतर पाण्याचा रोगनिवारणासाठी सुद्धा उपयोग होत असे. अशी पाण्यातील मधुरता मीच आहे.

सूर्यप्रकाशामुळे वनस्पती वाढतात आणि आपल्याला अन्न मिळते ही सूर्याची शक्ति मीच. सूर्याने दिवसभर निर्माण केलेली उष्णता कमी करण्याचे काम चंद्राचे. रात्रीच्या शांततेत झोपणे हे सुद्धा तितकेच आवश्यक. ही शीतलता देणारा मीच.

ओम शब्द साक्षात शिवा च्या मुखातून निर्माण झाला. ॐ' असे ह्याचे अदभूत चिन्ह, ह्याच्या उच्चारणाने आपल्या शरीरात उर्जा निर्माण होते. ओम म्हणजेच प्रणव तो मीच आहे

प्रकर्षेणनूयते स्तूयते अनेन इति, नौति स्तौति इति वा प्रणव:।

प्रणव='प्र - प्रकर्षेण, न - नयेत, व: -युष्मान मोक्षम इति वा प्रणव: | अर्थात हा तुम्हाला मोक्ष देईल.

नूयते नु धातु स्तुती करणे, प्रार्थना करणे कर्मणि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

स्तूयते स्तु धातु स्तुती करणे कर्मणि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

स्तुतौ स्तु धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद

नौति नु धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र पु ए. व.

प्रणवो धनु:शरोह्यात्मा ब्रह्मतल्लक्ष्यमुच्यते। अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत्तन्मयो भवेत् ॥

मुण्डकोपनिषद् 2.2.4।।

प्रणव धनुष आहे. जीवात्मा बाण आणि ब्रह्म हे लक्ष्य. दक्ष होऊन लक्ष्याचा वेध घ्यावा जसे अचूक बाण लक्ष्य भेदतो.

आपले शब्द उच्चारण हे तीन सप्तकात विभागले गेले आहे. मंद्र मध्य आणि तार. दोन स्वरांच्या मध्ये विशिष्ट अंतर ठरलेले असते. जसे 'सा' नंतर 'रे' च्या मधील अंतराला श्रुती म्हणतात. जे

ध्वनीलहरी च्या माध्यमातून मोजता येते. केवळ हवेच्या अस्तित्वामुळे आपल्याला ध्वनी ऐकू येतात. हवा आणि लहरी दोन्ही डोळ्यांना दिसत नाहीत. पण तिथे मीच असतो.

आणि सर्वात महत्त्वाचे नर जात जी इतर प्राण्यांपेक्षा वेगळी आहे. त्याला बुद्धि आहे सर्जनशीलता आहे हे पौरुषत्व म्हणजेच मी.

---

**पुण्यो गन्धः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ। जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु।।7.9।।**

पृथिव्याम् च पुण्यः गन्धः, विभावसौ तेजः च अस्मि; सर्व-भूतेषु जीवनम्, तपस्विषु तपः च अस्मि

पृथिव्याम् पृथ्वी मधे पृथिवी स्त्री स. ए. व.

च सुद्धा अव्यय

पुण्यः पवित्र पुण्य पु. प्र. ए. व.

गन्धः गन्ध पु. प्र. ए. व.

विभावसौ अग्नीमधे विभावसु पु. स. ए. व.

तेजः तेजस् नपु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अस्मि आहे अस् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

सर्व-भूतेषु सर्व सजीवांमधे सर्व-भूत नपु. स. ब. व.

जीवनम् जीवन नपु. प्र. ए. व.

तपस्विषु तपस्वींचे तपस्विन् पु. स. ब. व.

तपः तप पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अस्मि आहे अस् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

आतापर्यंत आपण श्रीभगवानकृष्णांच्या निरनिराळ्या अस्तित्वांची रूपे जाणून घेत आहोत त्याच्या पुढे.

सजीव सृष्टि व भोवतालची परिस्थिती ही त्या, त्या विशिष्ट वातावरणामुळे तयार झालेली असते, जसे हवामान, पर्जन्य यांना अनुसरून विशिष्ट जंगले तयार झालेली असतात. रेताड वाळवंटात राहणारे प्राणी आणि पक्षी हे घनदाट जंगलात राहणाऱ्या पशुपक्षांपेक्षा वेगळे असतात आणि त्यांचा एकमेकांशी चांगला समन्वय असतो. नारळ वड ही झाडे हिमालयात दिसत नाहीत. समुद्र आणि गोड्या पाण्यातील मासे आणि पक्षी निरनिराळे असतात.

अशा सर्व पृथ्वीवरच्या ह्या वातावरणातील गंध मीच आहे, असे भगवान श्रीकृष्ण म्हणत आहेत.

अग्नी मधील प्रकाशाची ज्योत पण मीच आहे. सर्व सजीवांची जगण्याची प्रेरणा आणि तपस्वी लोकांमध्ये तपस्या करण्याचे सामर्थ्य सुद्धा मीच आहे.

---

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम्। बुद्धिर्बुद्धिमतमस्मि तेजस्तेजस्विनामहम्।।7.10।।**

हे पार्थ! माम् सर्व-भूतानाम् सनातनम् बीजम् विद्धि, अहम् बुद्धिमताम् बुद्धिः, तेजस्विनाम् तेजः अस्मि

हे पार्थ!

माम् अस्मद् द्वि. ए. व.

सर्व-भूतानाम् सर्व-भूत पु. ष. ब. व.

सनातनम् सनातन पु. द्वि. ए. व.

बीजम् बीज नपु. द्वि. ए. व.

विद्धि, विद् धातु कर्तरि लोट्लकारः परस्मैपदम् म. पु. ए. व.

अहम् अस्मद् प्र. ए. व.

बुद्धिमताम् बुदधिमत् पु. ष. ब. व.

बुद्धिः बुद्धि स्त्री. प्र. ए. व.

तेजस्विनाम् तेजस्विन् पु. ष. ब. व.

तेजः तेजस् नपु. प्र. ए. व.

अस्मि अस् धातु कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

सना' या शब्दाचा मूळ अर्थ प्राचीन. सना भवः इति सनातन म्हणजे शाश्वत.

'ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः ।' कठोपनिषद्,2. 3.1।।

ज्याची मुळे वर आणि फांद्या खाली पसरल्या आहेत, त्या रूपकात्मक पिंपळाच्या झाडाला 'सनातन' म्हटले आहे.

बीज रोवणे असा शब्दप्रयोग आपण वापरतो त्याचा अर्थ एखाद्या गोष्टीची सुरुवात, परीवर्तन. सर्व जीवांचे म्हणजे 84 लक्ष जीवांचे बीज स्वतः भगवंत आहेत असे खूप मोठे भाष्य केले आहे ह्या श्लोकात. असे असताना आपल्या स्वार्थासाठी आपण जंगले आणि निरनिराळे पशू पक्षी नष्ट करून मोठेच पातक घडवत आहोत. त्याही पुढे जाऊन माणसा-माणसातील धार्मिक वाद अगदीच निरर्थक.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

हे पार्थ! मी सर्व सजीवांच्या (उत्पत्ती चे कारण) निर्मिती चे बीज हे समजून घे. मी बुद्धीवानांची बुद्धी आणि तेजस्वी लोकांचे तेज आहे.

---

**बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम्। धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ।।7.11।।**

हे भरतर्षभ! अहम् बलवताम् काम-राग-विवर्जितम् बलम् भूतेषु धर्म-अविरुद्धः, कामः च अस्मि

हे भरतर्षभ!

अहम् अस्मद् प्र. ए. व.

बलवताम् बलवानांमधला बलवत् पु. ष. ब. व.

काम-राग-विवर्जितम् इच्छा आणि क्रोध रहित काम-राग-विवर्जित पु. प्र. ए. व.

बलम् बळ बल नपु. प्र. ए. व.

भूतेषु सजीवांमधे भूत पु. स. ब. व.

धर्म-अविरुद्धः धर्माच्या विरूद्ध नसणारा धर्म-अविरुद्ध पु. प्र. ए. व.

कामः इच्छा काम पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अस्मि आहे अस् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

बुद्धि आणि शक्तीचा वापर नेहमीच दोन प्रकारांनी करता येतो. स्वतः च्या स्वार्थासाठी किंवा समाजकार्यासाठी. आपल्या ठायी असलेल्या तीन प्रकृती आणि मायाशक्ती च्या प्रभावाखाली आपण आपल्या बुद्धी आणि शक्ती चा वापर /गैरवापर करत असतो. अडीअडचणीत अचानक कोणीतरी समोर येते आणि मदत करून जाते आणि नकळत आपण म्हणतो 'अगदी देवासारखा भेटलास बाबा'. मोठा मासा छोट्या माशाला गिळून टाकतो हे माशांच्या जगातील नियम माणसांच्या जगात सुद्धा दिसून येतात.

आपल्या हातून पापकर्म का घडते ह्या अर्जुनाच्या 3.36 व्या श्लोकात विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर श्रीभगवानकृष्णांनी 3.37 व्या श्लोकात सांगितले आहे. त्यामध्ये काम, लालसा आणि क्रोध ह्यांचा परस्पर संबंधावर विस्ताराने सांगितले आहे.

जो श्रुतिगौरवाचिया मांडवीं । काम सृष्टीचा वेलु वाढवी ।

जंव कर्मफळेंसि पालवी । अपवर्गीं ठेक ॥ 7.50 ॥

काम वेदाच्या मांडवावर (कर्म-) सृष्टीरूप वेल, कर्मफलासह त्याची पाने मोक्षाला जाऊन भिडेपर्यंत वाढवतो. (तेथे मी असतो)

धर्म म्हणजे आपले कर्तव्य, आणि त्याचे पालन हे आपापल्या माहित आहेच. आपले आयुष्य 4 आश्रमांत विभागून, निरनिराळी कर्तव्ये आपल्याला सांगितलेली आहेत.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे भरत श्रेष्ठ! शक्तीमान लोकांचे इच्छा आणि क्रोध शून्य ओज मी आहे तसेच प्राणीमात्रांची अधर्म शून्य इच्छा सुद्धा मीच.

---

**ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये। मत्त एवेति तान्विद्धि नत्वहं तेषु ते मयि।।7.12।।**

ये च एव भावाः सात्त्विकाः ये राजसाः तामसाः च, तान् मत्तः एव इति विद्धि, तेषु अहं न ते तु मयि

ये यद् पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

एव सुद्धा अव्यय

भावाः भाव पु. प्र. ब. व.

सात्त्विकाः भाव पु. प्र. ब. व.

ये यद्  पु. प्र. ब. व.

राजसाः राजस पु. प्र. ब. व.

तामसाः तामस पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

तान् तद् पु. द्वि. ब. व.

मत्तः मत तासिल प्रत्यय

एव सुद्धा अव्यय

इति अव्यय

विद्धि विद् धातु कर्तरि लोट्लकारः परस्मैपदम् म. पु. ए. व.

तेषु तद् पु. स. ब. व.

अहं अस्मद् प्र. ए. व.

न अव्यय

ते तद् पु. प्र. ब. व.

तु परन्तु अव्यय

मयि अस्मद् स. ए. व.

ह्या श्लोकात सगुण आणि निर्गुण ह्या संकल्पना विषयी भाष्य केले आहे असे वाटते. परमात्मा हा सगुण आहे आणि तो त्रिगुणात अवताररुपाने साकारलेला आहे. त्याच वेळी तो निर्गुण म्हणजे निराकार सुद्धा आहे. आपल्यामध्ये असणारे अंतःकरण, मन, बुद्धि, भावना, विचार, वासना हे सर्व निराकार आहे.

आधीच्या श्लोकात श्रीभगवानांनी असे म्हटले आहेच की ते सर्व भूतांचे सनातन बीज आहेत, आणि त्यांनी असेही म्हटले आहे की सर्व भूतांना आपल्या नैसर्गिक प्रवृत्तीनुसार जगू द्यावे.

एखादे बी पेरल्यानंतर त्याचे झाड, पाने फुले ह्यामधे रूपांतर होते. त्या सर्वांत बी शोधता येत नाही.

द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते।

तयोर्न्यः पिप्पलं स्वादत्त्यनश्न्नन्न्यो अभिचक्षति ॥मुण्डकोपनिषद् 3.1.1।।

एकाच झाडावर दोन पक्षी (जीवात्मा, परमात्मा) बसले आहेत. एक जण फळे चाखत आहे आणि दुसरा त्याचा साक्षीदार आहे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

तीनही प्रकारचे गुण सतोगुण, रजोगुण आणि तमोगुण माझ्याच मुळे निर्माण झाले. हे सर्व (गुण) माझ्यामध्ये आहे पण मी ह्यांच्या मध्ये नाही हे तू लक्षात घे.

---

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत्। मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम्।।7.13।।**

एभिः त्रिभिः गुणमयैः भावैः इदम् सर्वम् जगत् मोहितम्, एभ्यः परम् अव्ययम् माम् न अभिजानाति।

एभिः यांचे इदम् पु. तृ. ब. व.

त्रिभिः तीन ही त्रि पु. तृ. ब. व.

गुणमयैः गुणांचे गुणमय पु. तृ. ब. व.

भावैः भाव पु. तृ. ब. व.

इदम् हे इदम् नपु. प्र. ए. व.

सर्वम् सर्व नपु. प्र. ए. व.

जगत् जगात जगत् नपु. प्र. ए. व.

मोहितम् मोह मोहित मुह् धातु क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

एभ्यः यांचे इदम् नपु. पं. ब. व.

परम् श्रेष्ठ पर पु. द्वि. ए. व.

अव्ययम् अविनाशी अ+व्यय पु. द्वि. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

न अव्यय

अभिजानाति जाणतो अभि+ज्ञा धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

परमेश्वर चराचरात भरलेला आहे, तर मग तो आपल्याला दिसत का नाही ह्याचे उत्तर सांगणारा हा श्लोक. आकाशात मळभ दाटलेले असते तेव्हा सूर्यप्रकाश सुद्धा धूसर होतो. मा म्हणजे नाही या म्हणजे ही. जी (अस्तित्वात) नाही ती माया.

7व्या अध्यायातील 3 ऱ्या श्लोकात जे सांगितले आहे तेच येथे विस्ताराने सांगितले आहे. तीन गुणांमुळे निर्माण होणाऱ्या नैसर्गिक प्रवृत्तीनुसार निरनिराळ्या स्वभावाची, निरनिराळ्या प्रकृतीची

माणसे दिसून येतात आणि ती स्वतःच्याच अस्तित्वात गुंतून पडलेली दिसतात. गुणमय म्हणजे त्रिगुणांमुळे निर्माण झालेली माया.

ह्या त्रिगुणांच्या गदारोळात खरे ज्ञान आणि त्याचा प्रकाश यांची स्पष्टता नसते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

हे सर्व जग त्रिगुणांमुळे मोहात पडले आहे. म्हणून ह्या गुणांपेक्षा श्रेष्ठ आणि अविनाशी अशा मला कोणी ओळखत नाही.

---

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया। मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते।।7.14।।**

एषा हि मम दैवी गुणमयी दुरत्यया माया । ये माम् एव प्रपद्यन्ते, ते एताम् मायाम् तरन्ति।

एषा हि एतद् स्त्री. प्र. ए. व.

हि सुद्धा अव्यय

मम माझी अस्मद् ष. ए. व.

दैवी दैवी स्त्री. प्र. ए. व.

गुणमयी गुणमयी स्त्री. प्र. ए. व.

दुरत्यया अवघड वाट दुरत्यया स्त्री. प्र. ए. व.

दुः+अती+अय

अय धातु जाणे

माया माया स्त्री. प्र. ए. व.

ये जे यद् पु. प्र. ब. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

एव हि अव्यय

प्रपद्यन्ते पोहोचतात प्र+पद् धातु जाणे कर्तरि लट् लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

ते ते तद् पु. प्र. ब. व.

एताम् ह्या एतद् स्त्री. द्वि. ए. व.

मायाम् माया स्त्री. द्वि. ए. व.

तरन्ति तरून जातात तॄ धातु  तरून जाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

मोह-माया हे आपल्याला स्वभाव दोष आहेत असे वाटते पण ह्या श्लोकात थोडा वेगळा विचार मांडला आहे. आधीच्या श्लोकात असे म्हटले होते की मायाजगात अडकून पडल्याने आपल्याला त्या पलीकडचे जग दिसत नाही. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की त्रिगुणांतून निर्माण झालेली माया ही सुद्धा दैवी शक्तीच होय. आणि ती आपल्या मनाची कसोटी पहात असते. भगवंतांनी आपल्याला दिलेले आव्हानच जणू. दुरत्यया हा किती चपखल शब्द वापरला आहे.

उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत।

क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया दुर्गं पथस्तत्कवयो वदन्ति ॥कठोपनिषद् 1.3.14।।

उठा जागे व्हा, गुरूजनांकडून बोध घ्यावा. सुरीच्या पात्यावर चालण्यासारखे हे कठीण आहे असे ऋषी म्हणतात. दुर्गम ह्या शब्दाचा अर्थ आपल्याला समजतो. यावरून दुर्गा ह्या शब्दाचा अर्थ समजून घेता येईल.

मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं च महेश्वरम् तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत्॥
श्वेताश्वतरोपनिषद्-4.10।।

माया हि प्रकृती चीच शक्ती आहे, आणि मायाचे अधीश्वर म्हणजे महेश्वर हे समजून घे. त्यानेच हे जग व्यापलेले आहे.

ह्या माया शक्तीचे असे वर्णन केले आहे

चतु॑ष्कपर्दा युव॒तिः सु॒पेशा॑ घृ॒तप्र॑तीका व॒युना॑नि वस्ते।। ऋग्वेद 10.114.3

माया शक्ती सदा तरूणी, कुशल रचना करणारी चतुर, सुखकर सहवासाचा अनुभव देणारी मात्र ज्ञानाचा अपकर्ष करणारी आहे.

आता ह्या कसोटीला सामोरे कसे जायचे? त्याचा एकच मार्ग भगवंतांना शरण जाणे आणि भगवद्भक्ती.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

हि माझीच दैवी, त्रिगुणातून निर्माण झालेली माया शक्ती आहे जिला पार करून जाणे अतिशय खडतर आहे. पण जे मला शरण येतात ते तरून जातात.

---

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः। माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः।।7.15।।**

मायया अपहृत-ज्ञानाः आसुरम् भावम् आश्रिताः दुष्कृतिनः नर-अधमाः मूढाः माम् न प्रपद्यन्ते।

मायया माया शक्तीमुळे माया स्त्री. तृ ए. व.

अपहृत-ज्ञानाः अपहरण झालेले ज्ञान अपहृत-ज्ञान पु. प्र. ब. व.

आसुरम् आसुरी आसुर पु. द्वि. ए. व.

भावम् स्वभावाचे भाव पु. द्वि. ए. व.

आश्रिताः आश्रय घेणारे आङः श्रि धातु आश्रय घेणे क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

दुष्कृतिनः दुष्कर्म करणारे दुष्कृतिन् पु. प्र. ब. व.

नर-अधमाः नराधम नर-अधम पु. प्र. ब. व.

मूढाः अज्ञानी मूढ पु. प्र. ब. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

न अव्यय

प्रपद्यन्ते पोहोचू शकत नाहीत प्र+पद् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

आधीच्या श्लोकात भगवंतांना शरण आलेले माया शक्ती पार करून तरून जातात असे म्हटले होते. आता ह्या श्लोकाचा अर्थ सहज समजतो.

ज्ञानं स्वभावो जीवानां मायया ह्यधिभूयते इति। माधवाचार्य

ज्ञान हा खरेतर जीवांचा स्वभाव पण तो त्रिगुणात्मक मायेने लुप्त होतो.

आपल्या रोजच्या आयुष्यात सुद्‌धा कोणत्याही गोष्टीचे पूर्ण ज्ञान असणे खूप फायदेशीर ठरते.

जर दैवी शक्ती असलेली माया ही आपली कसोटी घेण्याचे साधन असेल तर ज्याला ही परीक्षा पार करण्याचे ज्ञान आहे तो तरून जाईल पण ज्याचे ज्ञान ह्या मायावी शक्तिमुळे हरवून गेले आहे, (सर्वच ज्ञानी माणसे प्रभूला शरण जात नाहीत, कारण त्यांचा अहंकार मध्ये येतो) म्हणजे ज्ञान आहे पण ज्याला ग्रहण लागले आहे त्यामुळे अशा व्यक्तींचे वागणे असूरी, दुष्कर्म करणारे, हीन प्रवृत्ती असे दिसून येते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

दुष्कृत्य करणारे, नराधम, मूर्ख, ज्यांचे ज्ञान माया शक्ती मुळे झाकून गेले आहे असे आसुरी प्रवृत्तीचे लोक मला शरण येत नाहीत म्हणून माझ्या पर्यंत पोहोचू शकत नाहीत.

---

**चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन। आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ।।7.16।।**

हे भरतर्षभ अर्जुन! आर्तः, अर्थार्थी, जिज्ञासुः, ज्ञानी च चतुः-विधाः सुकृतिनः जनाः माम् भजन्ते।।

हे भरतर्षभ अर्जुन!

आर्तः आर्त पु. प्र. ए. व.

अर्थार्थी अर्थ प्राप्ती करू इच्छिणारा अर्थ अर्थिन् पु. प्र. ए. व.

जिज्ञासुः पु. प्र. ब. व.

ज्ञानी ज्ञानिन् पु. प्र. ए. व

च सुद्‌धा अव्यय

चतुः-विधाः चार प्रकारचे चतुःविध पु. प्र. ब. व.

सुकृतिनः उत्तम कर्म करणारे सुकृतिन् पु. प्र. ब. व.

जनाः भक्तजन जन पु. प्र. ब. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

भजन्ते भजतात भज् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

15 वा श्लोक वाचल्यानंतर सहाजिकच प्रश्न असा येतो की मग भगवानांपर्यंत कोण पोहोचू शकतो? भगवंतांनी चार प्रकारच्या लोकांचा उल्लेख केला आहे. ह्या चारही प्रकारचे लोक सुकृतिन् (सत्कृत्य करणारे) असणे आवश्यक आहे

त्यातील पहिला प्रकार म्हणजे

1.आर्त, येथे द्रौपदीची उपमा देण्याचा मोह आवरत नाही.

वस्त्रहरणाच्या वेळी तिने कृष्णाचा ज्या आर्ततेने धावा केला असेल त्याची कल्पना करवत नाही. 2. ज्ञान प्राप्ती साठी आसूसलेले जिज्ञासू ज्यांना अध्यात्मिक गोष्टी जाणून घेण्याची उत्सुकता असते. त्यांच्या मनाची कवाडे कायम ज्ञानासाठी उघडी असतात आणि ते सर्वांना गुरू करायला तयार असतात. 3. अर्थार्थी इथे ध्रुव बाळाचे उदाहरण लागू पडू शकेल. राजा असलेल्या पित्याच्या मांडीवर बसता आले नाही म्हणून अढळपद मिळवायचा निश्चय केला. आणि हे स्थान त्याला भक्तीमार्गानेच मिळवायचे होते. कोणत्याही कपट मार्ग न पत्करता त्याने अढळपद मिळवले. 4. ज्ञानी माणसांना सर्वच गोष्टीत ईश्वराचा अंश दिसत असतो. त्यांच्या मनात फक्त परमात्म्याचाच विचार असतो.

अशा चार प्रकारच्या लोकांचे म्हणणे भगवंत ऐकून घेतात.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

हे भरतर्षभ अर्जुन! पवित्र कर्म करणारे अर्थार्थी, आर्त, जिज्ञासु आणि ज्ञानी असे चार प्रकारचे लोक मला भजतात, (मला शरण येतात)

---

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते। प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः।।7.17।।**

तेषाम् नित्य-युक्तः एक-भक्तिः ज्ञानी विशिष्यते। हि ज्ञानिनः अहम् अत्यर्थम् प्रियः, सः च मम प्रियः

तेषाम् त्यापैकी तद् पु. ष. ब. व.

नित्य-युक्तः सदैव मला जोडलेले नित्य+युज् धातु जोडून घेणे क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

एक-भक्तिः पूर्ण समर्पित एक-भक्ति स्त्री. प्र. ए. व.

ज्ञानी ज्ञानिन् पु. प्र. ए. व.

विशिष्यते श्रेष्ठ आहेत वि+शिस् धातु पृथक्करण करणे कर्माणि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

हि सुद्धा अव्यय

ज्ञानिनः ज्ञानींना ज्ञानिन् पु. ष. ए. व.

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

अत्यर्थम् अत्यंत अत्यर्थ पु. द्वि. ए. व.

प्रियः प्रिय पु. प्र. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

मम माझे अस्मद् ष. ए. व.

प्रियः प्रिय पु. प्र. ए. व.

आता ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी आपल्या भक्तांचे गुणवत्तेनुसार वर्गीकरण केले आहे. ह्या श्लोकातील तेषाम् हा शब्द आधीच्या श्लोकातील चार प्रकारच्या (आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू आणि ज्ञानी) भक्तांना उद्देशून वापरला आहे. जाता जाता 'ज्ञानप्राप्ती सर्वश्रेष्ठ आहे' हे सुद्धा सांगितले आहे. जिज्ञासू आणि ज्ञानी ह्या दोघांमधे फरक कसा करावा? जिज्ञासा म्हणून ज्ञान मिळवणारे

अहंकाररहीत असतीलच असे नाही. मात्र ज्यांना परमात्म्याचे ज्ञान झाले आहे त्यांच्याकडे अहंकार तर नाहीच पण ते परमेश्वराला शरण गेले आहेत. शिवाय त्याच्या भौतिक इच्छाआकांक्षा सुद्धा लोप पावल्या आहेत. जसे ज्ञानी पूर्णतः परमेश्वराला समर्पित आहे तसे बाकीच्या भक्तांनी आपले इतर आयुष्य सोडून दिलेले नाही. इतर भक्तांना काही तरी साध्य करायचे आहे, ज्ञानी माणसाचे तसे नाही.

गुणी गुणं वेत्ति न वेत्ति निर्गुणो, बली बलं वेत्ति न वेत्ति निर्बलः।।

गुणी व्यक्तीच दुसऱ्याचे गुण जाणू शकते. बलवान व्यक्तीच दुसऱ्याचे बळ जाणू शकते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

त्यापैकी सदैव मलाच समर्पित, माझ्याशी एकरूप ज्ञानी हे सर्वश्रेष्ठ आहेत कारण ज्ञानी मला प्रिय आहेत आणि ज्ञानींना मी अत्यंत प्रिय आहे.

---

**उदारः सर्व एवैते ज्ञानी त्वमैव मे मतम्। आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम्।।7.18।।**

एते सर्वे उदाराः एव, ज्ञानी तु मे आत्मा एव मतम् । हि युक्त-आत्मा सः अनुत्तमाम् गतिम् माम् एव आस्थितः

एते हे एतद् पु. प्र. ब. व.

सर्वे सर्व पु. प्र. ब. व.

उदाराः उत्कर्ष झालेला उदार पु. प्र. ब. व.

उत्+ऋ धातु वर जाणे

एव नक्कीच अव्यय

ज्ञानी ज्ञानीन् पु. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

मे माझा अस्मद् ष. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

एव नक्कीच अव्यय

मतम् मत मन् धातु क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

हि सुद्धा अव्यय

युक्त-आत्मा युक्तआत्मन् पु. प्र. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

अनुत्तमाम् अती उत्तम अनुत्तमा स्त्री. द्वि. ए. व.

गतिम् गतीस्वरूप गति स्त्री. द्वि. ए. व.

माम् माझ्यात अस्मद् द्वि. ए. व.

एव नक्की अव्यय

आस्थितः स्थिरावलेला आङः+स्था धातु क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

आधीच्या श्लोकात ज्ञानी माणसे मला प्रिय आहेत असे श्रीभगवानकृष्णांनी म्हटले होते त्यामुळे सहाजिकच असा प्रश्न पडतो की मग इतरांचे काय जे सत्कृत्य करतात? परमेश्वराकडे भेदभाव कसा असेल?

गीत्वा च मम नामानि विचारेनम सन्निधौ। इति ब्रवीमि ते सत्यं कृतोहं तस्य चार्जुन।। आदि पुराण-1.2.231।। मी माझ्या भक्तांचा दास होतो ज्यांच्या मनात माझाच विचार असतो आणि ते माझे नामस्मरण करतात हे एक तत्थ्य आहे हे अर्जुन!

साधवो हृदयं मह्यं साधूनां हृदयं त्वहम् ।

मदन्यत् ते न जानन्ति नाहं तेभ्यो मनागपि ॥ श्रीमद्भागवतम् ।9.4.68।।

खरे भक्त कायम माझ्या हृदयात असतात आणि मी त्यांच्या हृदयात विराजमान असतो. माझे भक्त इतरांना कोणाला जाणत नाहीत आणि मी माझ्या भक्तांशिवाय इतरांना जाणत नाही.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

तसे तर सर्वच श्रेष्ठ आहेत पण ज्ञानी हे माझ्या आत्म्यासारखे आहेत असे मी मानतो कारण ते माझ्यातच स्थिरावलेला आहेत आणि त्यांच्या साठी परम लक्ष्य सुद्धा मीच आहे.

---

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते। वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः।।7.19।।**

बहूनाम् जन्मनाम् अन्ते ज्ञानवान् माम् प्रपद्यते 'सर्वम् वासुदेवः' इति । सः महात्मा सुदुर्लभः।

बहूनाम् बरेच बहु नपु. ष. ब. व.

जन्मनाम् जन्म जन्मन् नपु. ष. ब. व.

अन्ते शेवटी अन्त पु. स. ए. व.

ज्ञानवान् ज्ञानी ज्ञानवत् पु. प्र. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

प्रपद्यते शरण येतात भजतो प्र+पद् धातु जाणे कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

'सर्वम् सर्व नपु. प्र. ए. व.

वासुदेवः वासुदेव पु. प्र. ए. व.

इति असे अव्यय

सः तो तद् पु. प्र. ए. व.

महात्मा महान आत्मन् पु. प्र. ए. व.

सुदुर्लभः अतीदुर्लभ सु दुर्लभ पु. प्र. ए. व.

ज्ञानाचा सागर इतका मोठा आहे की पूर्ण ज्ञानप्राप्ती होण्यासाठी पुन्हा पुन्हा जन्म घेतला जातो. भारतीय तत्त्वज्ञानात पुनर्जन्माला मान्यता आहे. पुढील जन्मी आपण आधीच्या जन्मात मिळवलेले ज्ञान घेऊन जातो. श्रीसंत ज्ञानेश्वर हे अगदी चपखल उदाहरण आहेत. पूर्वीच्या जन्मी प्राप्त केलेल्या ज्ञानाच्या आधारावर त्यांनी ज्ञानेश्वरी लिहिली असे म्हणता येईल नाहीतर 15 व्या

वर्षी असे करणे केवळ अशक्यच. ह्या अध्यायाचे नावच ज्ञान-विज्ञान योग असे आहे. असा ज्ञानी शेवटी श्रीभगवानकृष्णांच्या चरणी लीन होणार हे सहाजिकच आहे.

अशा सामान्य माणसापासून ज्ञानी महात्मा होण्याचा प्रवास किती जन्मात होईल ते आपापल्या कुवतीनुसार ठरत असावे. त्याचा काही निश्चित आकडा नसावा. (कारण आठव्या अध्यायातील सहाव्या श्लोकात असे स्पष्टच म्हटले आहे की मृत्यूसमयी आपल्या मनात जे भाव असतील त्याप्रमाणे पुनर्जन्म प्राप्त होतो.)

ज्ञानं विशुद्धं परमार्थमेक-

मनन्तरं त्वबहिर्ब्रह्म सत्यम् ।

प्रत्यक् प्रशान्तं भगवच्छब्दसंज्ञं

यद्वासुदेवं कवयो वदन्ति ॥श्रीमद्भागवतम् 5.12.11 ॥

परम सत्याचा शोध घेताघेता ब्रह्माची अनुभूती त्यानंतर परम पुरुषाची अनुभूती त्यालाच ज्ञानी लोक वासुदेव म्हणतात.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

बऱ्याच जन्मांमधे ज्ञानप्राप्ती झाल्यावर जो मला शरण येतो आणि सर्वव्यापी वासुदेवाचे ज्ञान होते असा महान आत्मा दुर्लभच असतो.

---

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः। तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया।।7.20।।**

तैः तैः कामैः हृत-ज्ञानाः स्वया प्रकृत्या नियताः तम् तम् नियमम् आस्थाय अन्य-देवताः प्रपद्यन्ते।

तैः निरनिराळ्या तद् पु. तृ. ब. व.

तैः तद् पु. तृ. ब. व.

कामैः कामना काम पु. तृ. ब. व.

हृत-ज्ञानाः भ्रमित ज्ञान हृत-ज्ञान पु. प्र. ब. व.

हृ धातु हरण करणे

स्वया स्वतः स्वा स्त्री. तृ. ए. व.

प्रकृत्या नैसर्गिक प्रकृति प्रकृति स्त्री. तृ. ए. व.

नियताः संचालन नियत पु. प्र. ब. व.

तम् त्या तद् पु. द्वि. ए. व.

तम् त्या तद् पु. द्वि. ए. व.

नियमम् नियम पु. द्वि. ए. व.

आस्थाय आश्रयित आङ्ः+स्था धातु ल्यप प्रत्यय

अन्य-देवताः अन्य-देवताः स्त्री. प्र. ब. व.

प्रपद्यन्ते भजतात प्र+पद् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

अकाम: सर्व-कामो वा

मोक्ष-काम उदार-धी:

तीव्रेण भक्ति-योगेन

यजेत पुरुषम परम्। श्रीमद्भागवतम् 2.3.10।।एखाद्याला काही कामना असो वा नसो त्याला केवल मुक्तिची इच्छा असेल तरीही त्या श्रेष्ठ बुद्धिमान मनुष्याने तीव्र भक्तियोग अंगिकारला पाहिजे.

बरेचदा 36 कोटी देव असणाऱ्या कल्पनेची हेटाळणी केली जाते. त्यामागची संकल्पना अगदीच वेगळी आहे. प्रत्येकाला आवडणारे आपापले वेगवेगळे देव असतात जसे काहींना बुद्धीची देवता जास्त प्रिय तर काहींना शक्तीची देवता. त्या त्या देवतेच्या मान्यतेप्रमाणे पूजा अर्चा जप तप ह्यांचे नियम असतात. हे सर्व करण्यामागे अर्थातच काही सुप्त इच्छा असतात. कोणाला

धनप्राप्ती तर कोणाला पुत्रप्राप्ती ची इच्छा. श्रीमद्भगवद्गीतेमध्ये अशी स्वार्थी भक्ती अपेक्षित नाही. खरोखर सर्वांनी समजून घ्यावा असा श्लोक.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

निरनिराळ्या कामनांमुळे ज्यांचे ज्ञान (बुद्धि) भ्रमित झाले आहे ते आपल्या स्वभावानुसार प्रेरीत होऊन अन्य देवतांना त्या त्या पद्धतीनुसार भजतात.

---

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति। तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्।।7.21।।**

यः यः भक्तः याम् याम् तनुम् श्रद्धया अर्चितुम् इच्छति, तस्य तस्य ताम् एव श्रद्धाम् अहम् अचलाम् विदधामि।।

यः यः जो जो यद् पु. प्र. ए. व.

भक्तः भक्त  पु. प्र. ए. व.

याम् याम् ज्या ज्या यद् स्त्री. द्वि. ए. व.

तनुम् देवता रूप तनु स्त्री. द्वि. ए. व.

श्रद्धया श्रद्धेने श्रद्धा स्त्री तृ. ए. व.

अर्चितुम् पूजन अर्च् धातु तुमुन प्रत्यय

इच्छति इच्छा करतो इष् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

तस्य तस्य त्याच्या त्याच्या तद् पु. ष. ए. व.

ताम् त्या तद् स्त्री. द्वि. ए. व.

एव नक्की अव्यय

श्रद्धाम् श्रद्धा स्त्री. द्वि. ए. व.

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

अचलाम् स्थिर अचला स्त्री. द्वि. ए. व.

विदधामि प्रदान करतो वि+धा धातु धारण करणे कर्तरि लट् लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

आधीचा श्लोक वाचून असे वाटायला नको की इतर देवतांना पूजणे हे दुय्यम असावे. फक्त भक्ती मागील हेतू शुद्ध असावा. त्याच्या मर्जी शिवाय गवताचे पाते सुध्दा हलू शकत नाही असे म्हणतात पण तरी सुद्धा भगवंतांचे असे काही म्हणणे नाही कि सर्वांनी कृष्णाचीच भक्ती केली पाहिजे. अगदी कर्मयोगी वर सुद्धा त्याची कृपादृष्टी असतेच. सर्वांना स्वातंत्र्य आहे आपापल्या आवडीनुसार भक्ती करण्याचे, येथे कोणतीही एकाधिकारशाही नाही.

सनातन धर्मात निरनिराळ्या प्रकारचे पंथ आहेत, प्रत्येकाची श्रद्धास्थाने वेगवेगळी आहेत जसे

आकाशात् पतितं तोयं यथा गच्छति सागरम् | सर्वदेवनमस्कार: केशवं प्रति गच्छति ||श्री आदि शंकराचार्य।।

आकाशातून पडणारा पाऊस समुद्राला जाऊन मिळतो, त्याच प्रमाणे कोणत्याही देवतेला पूजले तरी तो नमस्कार श्रीहरि (श्रीकृष्ण) ला पोहोचतो.

हा तर्क इतर धर्मीय देवतांसाठी सुद्धा लावता येईल.

असाच अजून एक श्लोक

यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः

समुद्रमेवाभिमुखाः द्रवन्ति।।श्रीमद्भगवद्गीता 11.28।।

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

जो जो भक्त आपल्या श्रदधेनुसार ज्या ज्या प्रारूपात भक्ति करू इच्छितो त्या त्या ठिकाणी माझी कृपादृष्टी असते.

---

**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते। लभते च ततः कामान्मयैव विहितान् हि तान्।।7.22।।**

सः तया श्रद्धया युक्तः तस्य आराधनम् ईहते, ततः च मया एव विहितान् तान् कामान् हि लभते ।

सः तो तद् पु. प्र. ए. व.

तया त्याच्या तद् स्त्री तृ. ए. व.

श्रद्धया श्रद्धा स्त्री तृ. ए. व.

युक्तः संपन्न युज् धातु क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

तस्य त्याचे तद् पु. ष. ए. व.

आराधनम् पूजन आराधन नपु. द्वि. ए. व.

ईहते प्रयत्न करतो ईह् धातु प्रयत्न करणे कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

ततः त्याचे अव्यय

च सुद्धा अव्यय

मया माझ्या कडून अस्मद् तृ. ए. व.

एव सुद्धा अव्यय

विहितान् प्रदान केले वि+धा धातु धारण करणे क्तः प्रत्यय पु. द्वि. ब. व.

तान् त्या तद् पु. द्वि. ब. व.

कामान् इच्छा काम पु. द्वि. ब. व.

हि सुद्धा अव्यय

लभते प्राप्त करतो लभ् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात असे म्हटले आहे की प्रत्येक भक्त आपापल्या श्रद्धेनुसार त्या त्या प्रारूपात भक्ती करू शकतो आणि तेथे माझी कृपादृष्टी असतेच.

मात्र कर्ता करविता सर्व तोच आहे ह्या उक्तीचा प्रत्यय ह्या श्लोकात येतो. देवता, श्रीभगवंतांच्या अनुमती शिवाय आपल्या भक्तांचे भले करू शकत नाहीत.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

ज्या श्रद्धेने तो त्या त्या रूपाची आराधना करतो त्याला तसतसे फल मिळते कारण ते माझ्याकडूनच प्रदान केलेले असते.

---

**अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम्। देवान्देवायजो यान्ति मद्भक्ता यान्ति ममपि।।7.23।।**

तेषाम् अल्प-मेधसाम् तु तत् फलम् अन्तवत् भवति; देव-यजः देवान् यान्ति, मत् भक्ताः माम् अपि यान्ति।

तेषाम् त्यांचे तद् पु. ष. ब. व.

अल्प-मेधसाम् अल्पबुद्धि अल्प-मेधस् पु. ष. ब. व.

तु परन्तु अव्यय

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

फलम् फल नपु. प्र. ए. व.

अन्तवत् नाशवंत अन्तवत नपु. प्र. ए. व.

भवति होतो भू धातु होणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

देव-यजः देवतांना पूजणारे देव-यजस् पु. प्र. ब. व.

देवान् देवतांना देव पु. द्वि. ब. व.

यान्ति प्राप्त होतात या धातु जाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

मत् भक्ताः माझे भक्त अस्मद् भक्त पु. प्र. ब. व.

माम् मला अस्मद् द्वि ए. व.

अपि नक्की अव्यय

यान्ति जातात या धातु जाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

सर्व साधारणपणे अध्यात्मिक प्रगती टप्प्याटप्प्याने होत असते. ज्यामधे सुरवातीला हेतूपुरस्सर कर्मकांड करणे स्वाभाविकच आहे. काहीतरी मिळवायचे आहे पासून आता मला काहीही नको फक्त परमात्म्याशी एकरूप व्हायचे आहे इथपर्यंत चा सर्व विलक्षण प्रवास आहे.

संप्राप्यैनमृषयो ज्ञानतृप्ताः कृतात्मानो वीतरागाः प्रशान्ताः ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरा युक्तात्मानः सर्वमेवाविशन्ति ॥मुण्डकोपनिषद् 3.2.5।।

आत्म्यास प्राप्त करून ऋषिगण त्या ज्ञानाने संतुष्ट होतात. त्यांचे आत्मे परमस्थित होऊन ते वासनामुक्त होतात, मने शांत होतात. असे शांत आत्मे जो सदैव समर्पित राहून, सर्वव्यापी ब्रह्माला पाहतात आणि त्याच्याशी एकरूप होतात. पण हे स्थित्यंतर अतिशय अवघड असे आहे.

अथ त्रयो वाव लोकाः मनुष्यलोकः पितृलोको देवलोक इति; सोऽयं मनुष्यलोकः पुत्रेणैव जयाः, नान्येन कर्मणा; कर्मणा पितृलोकः, विद्या देवलोकः; देवलोको वै लोकानां श्रेष्ठः, तस्माद्विद्यां प्रशंसन्ति। ॥ बृहद-आरण्यक 1.5.16॥

तीन लोक अस्तित्वात आहेत, मनुष्य लोक, पितृलोक आणि देवलोक. मनुष्यलोक केवल पुत्रांमुळे मिळतो.अन्य अनुष्ठानाने नाही पितृलोक अनुष्ठानांमुळे प्राप्त होतो आणि देवलोक ज्ञानप्राप्ती ने. देवलोक सर्वश्रेष्ठ आहे म्हणून ज्ञान प्राप्ती सर्वश्रेष्ठ आहे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

परन्तु त्या अल्प बुद्धि पुरुषांच्या भक्तीचे फळ तात्पुरते असते (शाश्वत नाही) देवतांचे पूजन करणारे देवतांना प्राप्त होतात आणि माझे भक्त मला प्राप्त होतात.

---

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः। परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्।।7.24।।**

अबुद्धयः मम अनुत्तमम् अव्ययम् परम् भावम् अजानन्तः अव्यक्तम् माम् व्यक्तिम् आपन्नम् मन्यन्ते।

अबुद्धयः बुद्धि हीन न बुद्धि स्त्री प्र. ब. व.

मम माझे अस्मद् ष. ए. व.

अनुत्तमम् सर्वोत्तम अन् उत्तम पु. द्वि. ए. व.

अव्ययम् अविनाशी अव्यय पु. द्वि. ए. व.

परम् श्रेष्ठ पर पु. द्वि. ए. व.

भावम् भाव पु. द्वि. ए. व.

अजानन्तः न जाणता न+ज्ञा धातु शतृ प्रत्यय पु. प्र. ए. व.

अव्यक्तम् अव्यक्त पु. द्वि. ए. व.

माम् माझा अस्मद् द्वि. ए. व.

व्यक्तिम् व्यक्ति स्त्री. द्वि. ए. व.

आपन्नम् प्राप्त झालेला आपन्न पु. द्वि. ए. व.

मन्यन्ते मानतात मन् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

श्रीकृष्णाची विविध रूपे आपल्याला माहीत आहेत जसे बालपणीचा खट्याळ कान्हा पासून अर्जुनाला उपदेश करणारा कृष्ण. 4 थ्या अध्यायातील 5व्या आणि 6व्या श्लोकात ईश्वराच्या निराकार आणि साकार रूपांची चर्चा करून झाली आहे.

परमेश्वराची कोणत्याही रूपात भक्ती करावी फक्त त्याची कृपा होणे महत्त्वाचे.

अथापि ते देव पदाम्बुजद्वय-

प्रसादलेशानुगृहीत एव हि ।

जानाति तत्त्वं भगवन् महिम्नो, न चान्य एकोऽपि चिरं विचिन्वन् ॥ श्रीमद्भागवतम् 10.14.29 ॥

प्रभु, कोणावर आपल्या चरणकमलांची थोडी जरी कृपा झाली, तर तो आपल्या व्यक्तिमत्वाची महानता  समजू शकेल. परन्तु जे लोक तुझे चिंतन करतात, ते तुम्हाला जाणून घेण्यास असमर्थ असतात, भले ते कितीतरी वर्षे वेदांचे अध्ययन करत असतील.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणत आहेत की

बुद्धिहीन माणसे माझे सर्वोत्तम अविनाशी श्रेष्ठ भाव न जाणून घेता माझे त्यांच्या समोर प्रकट झालेल्या रूपातच मला बघतात.

---

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः। मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम्।।7.25।।**

योग-माया-समावृतः अहम् सर्वस्य प्रकाशः न। अयम् मूढः लोकः अजम् अव्ययम् माम् न अभिजानाति।

योग-माया-समावृतः योगमायेने झाकून गेलेला योग-माया-समावृत पु. प्र. ए. व.

सम्+आ+वृत् धातु+क्तः प्रत्यय

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

सर्वस्य सर्वांच्या समोर सर्व पु. ष. ए. व.

प्रकाशः प्रकट प्रकाश पु. प्र. ए. व.

न अव्यय

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

मूढः मूर्ख मूढ पु. प्र. ए.व.

लोकः समुदाय लोक पु. प्र. ए.व.

अजम् जन्मरहीत अज पु. द्वि. ए. व.

अव्ययम् अविनाशी अव्यय पु. द्वि. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

न अव्यय

न अभिजानाति ओळखत नाही अभि+ज्ञा धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

हा श्लोक वाचला की 4 थ्या अध्यायाची आठवण होते ज्यामधे श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला रहस्य सांगतो असे म्हणत आहेत. ईश्वर सर्वव्यापी आहे तर तो सर्वांना दिसत का नाही, असा प्रश्न वारंवार विचारला जातो.

मयाऽवनिकाच्छन्नमज्ञाधोक्षजमव्ययम्।

न लक्ष्यसे मूढदृशा नतो नाट्यधरो यथा ॥ श्रीमद्भागवतम् 1.8.19 ॥

परमेश्वर माया शक्ती च्या पडद्याआड झाकून गेले आहेत म्हणून अज्ञानी लोकांना ते दिसत नाहीत जसे एखाद्या कलाकाराला अभिनेत्या च्या वेषात ओळखता येत नाही.

(आधीच्या श्लोकात कुंती माता असे विचारत आहे की तुमचे अस्तित्व सगळीकडे आहे तर तुम्ही अदृश्य कसे आहात? त्यावर दिलेले हे उत्तर)

हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्।

तत् त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥ ईशावास्योपनिषद 15।।

सत्य चमकत्या झाकणाने झाकून गेले आहे. सूर्यदेवा सत्याचे दर्शन होण्यासाठी तू ते झाकण हटव. अध्यात्माचा मुख्य हेतूच ईश्वर आणि आपल्यामधील असणाऱ्या मायाशक्ती चे पडदा नष्ट करण्याचा आहे. त्यामुळे ह्या श्लोकात असलेल्या योगमाया ह्या शब्दाचा अर्थ समजून घ्यायला हवा. माया म्हणजे भ्रम. स्वतः श्रीभगवानकृष्ण, योगेश्वर आहेत. त्रिगुणांनी तयार झालेली मायाशक्ती, म्हणजेच अविद्या. न प्रकाशः असा समर्पक शब्द ह्या श्लोकात वापरला आहे.

योगमाया च महामाया च। योगमाया सर्वभूतेषु प्रतिष्ठिता।ब्रह्मवैवर्त पुराण, स्कंद 1, अध्याय 7, श्लोक 5:।। "योगमाया आणि महामाया दोन शक्ती आहेत. योगमाया सर्व प्राणिमात्रांत दिसून येते. "

योगमाया ची अनेक नावे आहेत, जसे माया, मोहिनी, रति, रम्भा, उर्वशी आणि अप्सरा.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ

मी योगमाया ने झाकून गेल्यामुळे सर्वांना प्रत्यक्ष दिसत नाही. मोहग्रस्त लोक माझे जन्मरहीत अविनाशी रूप जाणत नाही.

---

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन। भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन।।7.26।।**

हे अर्जुन! समतीतानि वर्तमानानि च भविष्याणि भूतानि च अहम् वेद। माम् तु न कश्चन वेद ।

हे अर्जुन!

समतीतानि भूतकाळाचे समतीत नपु. द्वि. ब. व.

सम+अती+इ धातु जाणे +क्तः प्रत्यय

वर्तमानानि वर्तमान काळाचे वर्तमान नपु. द्वि. ब. व.

च सुद्धा अव्यय

भविष्याणि भविष्याचे भविष्य नपु. द्वि. ब. व.

भूतानि सजीवांना भूत नपु. द्वि. ब. व.

च सुद्धा अव्यय

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

वेद जाणतो विद् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

तु परन्तु अव्यय

न अव्यय

कश्चन कोणीही किञ्चन पु. प्र. ए. व.

वेद जाणतो विद् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

परमेश्वराचे अस्तित्व दर्शवणारे निरनिराळे श्लोक आपण वाचत आहोत. आता ह्या श्लोकात अनादी अस्तित्वाचे वर्णन केले आहे.

अपाणिपादोऽहमचिन्त्यशक्तिः पश्याम्यचक्षु: स श्रुणोम्यकर्ण:। अहं विजानामि विविक्तरूपो न चास्ति वेत्ता मम चित्सदाहम्।। कैवल्य उपनिषद् 21।।

ज्याचे हात, पाय नाहीत आणि ज्याच्या बद्दल कल्पना सुद्धा करता येत नाही ती शक्ति म्हणजे अर्थातच परब्रह्म मीच आहे. मी बुद्धिशिवाय सर्व काही जाणतो, कानांशिवाय ऐकू शकतो आणि डोळ्यांशिवाय बघू शकतो. सगुण साकार रूपांच्या पलिकडे मी असून माझे चैतन्यशक्ती स्वरूपी अस्तित्व कोणी जाणत नाही.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

हे अर्जुन! पूर्वी घडलेल्या, वर्तमानातील आणि भविष्यात घडणाऱ्या समस्त सजीवांना मी जाणतो. मला मात्र कोणी जाणत नाही.

---

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वन्द्वमोहेन भारत। सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परन्तप।।7.27।।**

हे परन्तप भारत ! सर्गे इच्छा-द्वेष-समुत्थेन द्वन्द्व-मोहेन सर्व-भूतानि सम्मोहम् यान्ति ।

हे परन्तप भारत !

सर्गे सृष्टी सर्ग पु. स. ए. व.

सृज् धातु रचना करणे

इच्छा-द्वेष-समुत्थेन इच्छा आणि द्वेष यामधून निर्माण झालेला इच्छा-द्वेष-समुत्थ पु. तृ. ए. व.

द्वन्द्व-मोहेन द्वन्द्व

द्वन्द्व-मोह पु. तृ. ए. व.

सर्व-भूतानि सर्व सजीव सर्व-भूत नपु. प्र. ब. व.

सम्मोहम् संभ्रम सम्मोह पु. द्वि. ए. व.

यान्ति प्राप्त करतात या धातु जाणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

ह्या श्लोकात अर्जुनाला हे परन्तप! असे संबोधून एक वेगळाच संदेश महर्षी व्यासांना द्यायचा आहे असे वाटते. परन्तप म्हणजे शत्रू ला ताप देणारा. पण आपल्याच मनातील शत्रूं आपल्याला ताप देतात त्यांचे काय?

इच्छा म्हणजे तीव्र वासना आणि द्वेष म्हणजे तीव्र तिटकारा. एखादी गोष्ट आपल्याला आवडते किंवा अजिबात आवडत नाही ह्यामागे असतात आपल्या इच्छा किंवा अनिच्छा. एकाने सुख मिळेल असे वाटते तर दुसऱ्याने दुःख. द्वन्द्व ह्या शब्दाभोवती सर्व श्लोकाचा अर्थ सामावलेला आहे.

मराठीतील द्वन्द्व-समास म्हणजे दुहेरी शब्द जे दोन्हीही सारखेच महत्त्वाचे आहेत. ह्या श्लोकात भावनिक द्वन्द्वाबददल विचार मांडला आहे.  आपल्या जन्मापासून हे द्वन्द्व सुरू होते.

जन्म झाला की मृत्यु अटळ आहेच पण तो आवश्यक सुद्धा आहे. दुःख आहे म्हणून सुखाची आपल्याला ओढ लागते.हिंसा नको वाटते म्हणून अहिंसेचा मार्ग पत्करावासा वाटतो.

 राग-लोभ, सत्य-असत्य अशा कितीतरी दुहेरी भूमिका असतात ज्यामुळे सर्व जीवितांच्या मनामध्ये संभ्रम निर्माण झालेला असतो.

(ह्या अशा द्वन्द्व पासून मुक्ति म्हणजेच आपण आपल्या मनावर मिळवलेला ताबा. सुवर्णमध्य.)

यदृच्छया मत्कथादौ जातश्रद्धस्तु य: पुमान् ।

न निर्विण्णो नातिसक्तो भक्तियोगोऽस्य सिद्धिद: श्रीमद्भागवतम् ॥11.20. 8 ॥

जर काही कारणाने माझा महिमा ऐकून मनात श्रद्धा निर्माण झाली तर माणूस विरक्त होणार नाही तसेच आसक्ती सुद्धा राहणार नाही. तर माझ्या प्रती भक्तीमार्गाने सिद्धी प्राप्त करून घेईल.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे परन्तप भारत! इच्छा आणि अनिच्छा यामधून द्वन्द्व निर्माण होते. या भौतिक जगात समस्त जीव अशा द्वन्द्वाने संभ्रमित आहेत.

---

**येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम्। ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः।।7.28।।**

येषाम् पुण्य-कर्मणाम् तु पापम् जनानाम् अन्तगतम्, ते द्वन्द्व-मोह-निर्मुक्ताः दृढ-व्रताः माम् भजन्ते।।

येषाम् ज्यांचे यद् पु. ष. ब. व.

पुण्य-कर्मणाम् पवित्र कर्म करणारे पुण्य-कर्मन् नपु. ष. ब. व.

तु परन्तु अव्यय

पापम् पाप नपु. प्र. ए. व.

जनानाम् लोकांचे जन पु. ष. ब. व.

अन्तगतम् नष्ट होते अन्त +गम् धातु जाणे क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

ते ते तद् पु. प्र. ब. व.

द्वन्द्व-मोह-निर्मुक्ताः द्वन्द्वाच्या मोहातून मुक्त

द्वन्द्व-मोह निर् +मुच् धातु क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

दृढ-व्रताः दृढनिश्चयी दृढव्रत पु. प्र. ब. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

भजन्ते भजतात भज् धातु कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ब. व.

आधीच्या श्लोकात समस्त जन मनातील द्वन्द्वामुळे संभ्रमित आहेत असे म्हटले होते. अध्यात्माचा हेतू हाच आहे की त्याचा पुरस्कार करून लोकांनी तमोगुण आणि रजोगुणापासून सात्विक गुणांना आत्मसात करावे. पाप ही रजो गुणाची अभिव्यक्ति. दुष्ट व्यक्ति चांगला भक्त होऊ शकत नाही असे नाही. क्षिप्रं भवति धर्मात्मा। श्रीमद्भगवद्गीता 9.31। जर वाईट कर्मे सोडून दिली तर तो लवकरच भक्त होतो.

विकर्म यच्चोत्पतितं कथञ्चिद् धुनोति सर्वं हृदि सन्निविष्टः ॥ श्रीमद्भागवतम् 11.5.42 ॥

जे प्रामाणिकपणे भगवंतांना शरण गेले आहेत त्यांच्या कडून जर काही वाईट कृत्य घडले तर ते पाप स्वतः भगवंत नष्ट करतात.

पण मुळात हा मार्ग कोण दाखवून देणार?

महत्सेवेन द्वारमाहुर्विमुक्ते-

स्तमोद्वारं योषितां सङ्गिसङ्गम्। महान्तास्ते समचित्त: प्रशान्त विमान्यव: सुहृद: साधवो ये ॥ श्रीमद्भागवतम् 5.5.2॥

महान पुरुषांची संगत आपल्याला मुक्तीचा मार्ग दाखवणारी असते तर भोगी लोकांची संगत अधोगतीचा मार्ग दाखवणारी असते. एकदा का मार्ग सापडला की दृढता पूर्वक त्याचा अवलंब केला पाहिजे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे सांगत आहेत की

जे पुण्याचे कर्म करणारे असतात त्यांची पापे नष्ट होतात, असे लोक द्वन्द्वाच्या मोहातून मुक्त होऊन दृढतेने माझी भक्ती करतात.

---

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये। ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम्।।7.29।।**

ये माम् आश्रित्य जरा-मरण-मोक्षाय यतन्ति, ते तत् ब्रह्म, कृत्स्नम अध्यात्मम्, अखिलम् कर्म च विदुः ।

ये जे यद् नपु द्वि. द्वि. व.

माम् माझ्या अस्मद् द्वि. ए. व.

आश्रित्य आश्रयाला येणे आ +श्रि धातु सेवा करणे ल्यप् प्रत्यय

जरा-मरण-मोक्षाय वार्धक्य मृत्यू पासून मुक्ती साठी जरा-मरण-मोक्ष पु. च. ए. व.

यतन्ति प्रयत्न करतात यत् धातु प्रयत्न करणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

ते ते तद् पु. प्र. ब. व.

तत् तद् नपु. द्वि. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

कृत्स्नम सर्वकाही कृत्स्न नपु. द्वि. ए. व.

अध्यात्मम् अध्यात्म नपु. द्वि. ए. व.

अखिलम् समस्त अखिल नपु. द्वि. ए. व.

कर्म कर्मन् नपु. द्वि . ए. व.

च सुद्धा अव्यय

विदुः जाणतात विद् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

हा श्लोक म्हणजे 8 व्या अध्यायाची नांदी असे म्हणायला हरकत नाही. आपल्याला एखाद्या आजारपणातून मुक्ती किंवा काही सुखाची अपेक्षा असेल तर आपण ईश्वराला साकडे घालतो. येथे नेमका उलटा विचार सांगितला आहे. शरीर नश्वर आहे हे चांगले समजले की त्यापासून होणाऱ्या त्रासाचे फारसे दुःख होत नाही.

आतापर्यंतच्या बऱ्याच श्लोका मध्ये ज्ञानी माणसे ज्ञान प्राप्त करुन परमेश्वराला शरण जातात असे आपण वाचले आहे.

ह्या अध्यायातील 16 व्या श्लोकात 4 प्रकारच्या भक्तांचे वर्णन सुद्धा आपण वाचले आहे. सर्व प्रकारच्या साधने चे लक्ष्य मोक्ष मिळवणे हेच आहे. ज्ञानी माणसांनी आपल्या मनावर इतका ताबा मिळवला आहे की त्यांना त्यांच्या वार्धक्याचा सुद्धा त्रास जाणवत नाही. (कोणतेही शारीरिक कष्ट त्यांच्या मनाला पीड़ा उत्पन्न करू शकत नाही) कारण आता ते स्वतः च ब्रह्म झाले आहेत.

अहम् ब्रह्मास्मि।

नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ।

यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम्।कठोपनिषद्-1.2.23।।

मुण्डकोपनिषद् 3.2.3।।

ईश्वराला अध्यात्मिक उपदेश, बुद्धि आणि बहुश्रुत होऊन प्राप्त करता येत नाही. जेव्हा परमेश्वराची  कृपादृष्टी होते तेव्हा आत्मसाक्षात्कार होतो.

ह्या श्लोकात श्रीभगवान असे म्हणतात की

जे माझ्या आश्रयाला येतात ते वार्धक्य आणि मृत्यू (पुनर्जन्म) मुक्ति मिळवण्याचा प्रयत्न करतात. त्यांनी ब्रह्म, अध्यात्म आणि समस्त कर्म पूर्णपणे जाणलेले असते.

---

**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः। प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः।।7.30।।**

साधिभूत-अधिदैवम् साधियज्ञम् च माम् विदुः युक्त-चेतसः च ये प्रयाण-काले अपि ते माम् विदुः।

साधिभूत-अधिदैवम् सृष्टीचा संचालक देवतांचा नियंत्रक स+अधिभूत अधिदैव पु. द्वि. ए. व.

साधियज्ञम् सर्व यज्ञाचा अधिष्ठाता स+अधियज्ञ पु. द्वि. ए. व.

च सुद्धा अव्यय

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

विदुः जाणतात विद् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

युक्त-चेतसः मत्परायण होऊन युक्त-चेतस् पु. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

ये जे यद् पु. प्र. ब. व.

प्रयाण-काले मृत्यू समयी प्रयाण-काल पु. स. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

ते ते तद् पु. प्र. ब. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

विदुः जाणतात विद् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

ह्या अध्यायातील हा शेवटचा श्लोक.

ह्यामधे असलेले तीन शब्द अधिभूत अधिदैव आणि अधियज्ञ याबद्दल 8 व्या अध्यायातील 4 थ्या श्लोकात आपण वाचणार आहोत. अधिभूत म्हणजे भौतिक अस्तित्वाचा आधार. अधिदैव म्हणजे सूक्ष्म अस्तित्वाचा आधार. सृष्टीची रचना करणाऱ्या ब्रह्मदेवाला अधिदैव म्हणतात. अधियज्ञ श्रीविष्णूंचे नाव आहे.

आधीच्या श्लोकाचा संदर्भ घेऊन श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की जे ज्ञानी आहेत (ज्यांना माझे अस्तित्व जाणवले आहे, जे प्रबुद्ध आहेत) त्यांना माझे जीवसृष्टी वरचे अधिपत्य, सर्व देवतांवरचे अधिपत्य आणि सर्व यज्ञकर्मांवरचे अधिपत्य माहीत झाले आहे ते अंतिम समयी माझाच विचार करत असतात आणि माझ्यातच सामावलेले असतात.

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे भगवद्ज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥**

अशा प्रकारे उपनिषद्, ब्रह्मविद्या आणि योगशास्त्रस्वरूप श्रीमद् भगवद्गीतेतील श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या संवादांचा भगवद्ज्ञान-योग नावाचा सातवा अध्याय पूर्ण झाला.

॥ हरि: ॐ तत् सत् ॥

---------------------------🙏🙏🙏🙏-------------------------------

ITIANAGHA